राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरण, मुंबई यांच्या आस्थापनेवरील शिपाई या १ (एक) अस्थायी पदाला मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एमसीटी-२०१७/प्र.क्र.६९/परिवहन-५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १७ मार्च, २०२२.

वाचा :- १) शासन निर्णय, गृह विभाग क्र. एमसीटी-२०१७/प्र.क्र.६९/परि-५, दिनांक २०.०९.२०२१.
२) प्रभारी प्रबंधक, राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरण, मुंबई यांचे पत्र क्र.रापअन्या/आस्था/१४/२०२२, दिनांक ०५.०३.२०२२.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २२.०२.२०२२.

**प्रस्तावना :-**

राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयामधील १ (एक) अस्थायी पदाला संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयानुसार दिनांक ०१.०९.२०२१ ते २८.०२.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर शिपाई या १ (एक) पदाची मुदत दिनांक २८.०२.२०२२ रोजी संपुष्टात आली आहे. प्रभारी प्रबंधक, राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी आता शिपाई या १ (एक) अस्थायी पदाला दिनांक ०१.०३.२०२२ पासून पुढे मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे. सदर पदास दिनांक ०१.०३.२०२२ ते ३१.०८.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील शिपाई या १ (एक) अस्थायी पदास दिनांक ०१.०३.२०२२ ते ३१.०८.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर मुदतवाढ ही राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरणाकडे प्रलंबित असलेले दावे त्वरीत निकाली काढणे, निकाली काढलेल्या दाव्यांचे माहे मे,२०२२ व ऑगस्ट,२०२२ अखेरचे विवरणपत्र शासनास सादर करणे तसेच दिनांक २८.०२.२०२२ अखेर प्रलंबित असलेल्या दाव्यातील ५० टक्के प्रलंबित दावे निकाली काढल्याचे दिसून न आल्यास पुढील मुदतवाढ मिळणार नाही या अटीच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

(एक) अस्थायी पदाबाबतची माहिती पुढीलप्रमाणे देण्यात आली आहे :-

| अ.क्र. | पदनाम | अस्थायी (तात्पुरती) पदे | पदे निर्माण केल्याचा शासन निर्णयाचा क्रमाक व दिनांक. |
|---|---|---|---|
| १. | शिपाई | १ | Resolution No.MVA-१७७०/ ७०३(B)-XII, Sachivalaya, Bombay-३२, Date-३०th April, १९७१ |
| | **एकूण पदे** | **१** | |

२.        या बाबीवरील होणारा खर्च “मागणी क्र. बी-३, २०४१-वाहनावरील कर, (००) ८००-इतर खर्च (००)(०२)-राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरण (२०४१ ०१३४)” या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३.        हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २२.०२.२०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४.        सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०३१७१७२९१७७६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

JAYSEN JAYPRAKASH INGOLE

Digitally signed by JAYSEN JAYPRAKASH INGOLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fac1868a3a3bc62404072a90fb604cfa54cc0c6b396bbe9f862cb814602e0bfd, pseudonym=92EF270887986A691552A8D64F666519350065AB, serialNumber=7C9E48AC69F313DEECCD6E9EECEEA57A822C9D8CCACD64DD1C5031B045E7C1F2, cn=JAYSEN JAYPRAKASH INGOLE
Date: 2022.03.17 17:30:35 +05'30'

**( जयसेन जयप्रकाश इंगोले )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.पिठासन अधिकारी, राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. प्रबंधक, राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. वित्त विभाग (व्यय-८/वित्तीय सुधारणा/आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. अवर सचिव (बीयुडी-१/परिवहन-४), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ००५.
८. निवड नस्ती - परिवहन -५.